कॅनेडियन नायिका

# रोबर्टा बोन्डर

## अंतराळ यात्री



मराठी : गार्गी लागू





# रोबर्टा बोन्डर
## अंतराळ यात्री

४ डिसेंबर १९४५ साली रोबार्टाचा जन्म झाला, तोपर्यत कुणाहि मानवाने अंतरिक्षात प्रवास केला नव्हता. ऑंटारियोमधे रोबार्टा लहानाची मोठी झाली. लहानपणापासूनच तिला विज्ञानामधे रुची होती. हे जाणून तिच्या परिवाराने तीला रसायन शास्त्रावरील विज्ञान संच भेट दिला. त्यानंतर केवळ ७ वर्षाची रोबर्टा तळघरातील तिच्या वडिलांच्या प्रयोगशाळेत प्रयोग करू लागली.

प्रयोगशाळेत रोबर्टा प्लास्टिकची " माडेल राकेट" बनवायची. वैज्ञानिक ललित साहित्यही तिला आवडायचे. 'नाटक-नाटक खेळतांना, जणू काही तिचे नाटक रेडियोवरून प्रसारित होणार्या "फ्लैश गार्डन" या कार्यक्रमातून प्रसारित होत आहे अशा थाटात, तिचे राकेट मंगळ ग्रहाच्या दिशेने जात आहे असे सांगत असे. तीच्या आठवणी सांगतांना तिने सांगितले की ती ८ वर्षाची असतांना कुणी अंतरिक्षात प्रवास करण्याची कल्पनाही करू शकत नव्हता.



तिची मोठी बहिण बारबारा बरोबर तिने ' अंतराळाची  सफर' नाटक शेजारी पाजारी घराघरातून केले. सुपिरिअर तलावाकाठी तिच्या परिवाराचे एक घर होते. रात्री त्या घराच्या गच्चीवरून  ती दळणवळण उपग्रह 'इको १' आकाशातून फिरताना पहात असे. कधीतरी आपणपण असे अंतराळालात फिरू हे तिचे स्वप्न होते.

" माझ्यापेक्षा पक्षी खूपच भाग्यवान आहेत. ते आकाशात उंच उडून तिथून पृथ्वीचे निरिक्षण करू शकतात. कदाचित म्हणूनच आकाशात उंच उडण्याची इच्छा माझ्या मनात निसर्गत:च निर्माण झाली." रोबर्टा सांगते. गणित आणि विज्ञान हे विषय तिला जेव्हढे आवडत होते तेव्हढेच "गर्ल गाईड" व्हायलापण आवडत होते.



*गर्ल गाइड बारबरा आणि रोबर्टा*

जेम्स डन कालेजिएट आणि व्होकेशनल स्कूमधून रोबर्टाने उच्च माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर लंडनमधे युनिव्हर्सिटी आफ गुएल्फ व यूनिव्हर्सिटी आफ वेस्टर्न ऑंटारियो उच्च शिक्षणासाठी गेली. युनिव्हर्सिटी आफ टोरंटो मधून डाक्टरेट पदवी मिळविली. अधिक ज्ञान मिळविण्याची उर्मी तिला कॅनडा आणि अमेरिकेच्या वैद्यकिय कालेजमधे घेऊन गेली. तिथे ती न्यूरो आप्थाल्मोलाजिस्ट, म्हणजे डोळ्याचे कार्य कसे चालते या विषयातील विशेषज्ञ बनली.



*प्रशिक्षण  काळात पॅराशूटला  लटकलेली रोबर्टा.*

१९८३ मधे डा. रोबर्टाने त्यावेळी नवीन तयार केला गेलेल्या अंतराळ यात्री कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी अर्ज केला. त्याच वर्षी डिसेंबर महिन्यात अर्जाची छाननी होऊन इतर ५ कॅनडातील लोकाबरोबर रोबर्टालाहि प्रशिक्षणासाठी 'नासा' मधे पाठविण्यात आले. प्रशिक्षण खूपच कठिण होते. इतर लोकासारखे  तिलाही ' वामिट कामेट' मधे जावे लागले. उडतांना उलटी होऊ नये म्हणून काय करावे याचे प्रशिक्षण तिथे दिले जाते.

तिने पाण्याच्या पृष्ठभागाखाली जाऊन प्रशिक्षण घेतले ज्यामुळे 'भाररहित' अवस्थेत कसे रहायचे याची कल्पना आली. २२जानेवारी १९९२ रोजी तिची मनोकामना पूर्ण झाली. ९वाजून ५२मिनिट ३३ सेकंदला तिच्या अंतराळ यान, " डिस्कव्हरी" ने अवकाशात झेप घेतली.

डाक्टर बोन्डरने परत आल्यावर सांगितले कि झेप घेतेवेळी कुणीतरी तिचे खांदे पकडून, हलवून तिला उठवित आहे. पण ती मुळीच घाबरली नाही. तिला ज्या कामासाठी प्रशिक्षित केले होते ते काम ती करीत राहिली. पुढच्या ८ दिवसात अंतराळ यानाने पृथ्वीभोवती १९२ प्रदक्षिणा केल्या. डा. बोन्डरने अवकाशातून पृथ्वीचे अनेक छायाचित्रे घेतली.



*अंतराळ यानातून जेम्स बे चे छायाचित्र*

"अंतराळ यात्रा" कार्यक्रमामधे डा. रोबर्ट "पे-लोड" विशेषज्ञ म्हणून सहभागी झाली होती. 'भाररहीत' अवस्थेचा मानवी शरीरावर होणारा परिणाम समजून घेण्यासाठी तिने अनेक प्रयोग केले.



*डा. बोन्डर अंतराळ यान, "डिस्कव्हरी" च्या प्रयोगशाळेत प्रयोग करीत असतांना*

अंतराळ यानामधील सहप्रवासी पावाच्या तुकड्याचे बारिक कण इकडे तिकडे पसरू नयेत म्हणून 'टोरटियास' म्हणजे पक्की भाजलेली पोळी खात हेते. आणि धातूच्या कपाटांत स्लिपिंग बॅगमधे झोपत होते.



इतर सर्व ' अंतराळ यात्रा' कार्यक्रमाप्रमाणे ही यात्राही तितकीच धोकादायक, तरी उत्साह वाढविणारी ठरली. अवकाशातील गूढ अंधरातून प्रवास करतांना डा. बोन्डरना पृथ्वीचे वेगळेपण प्रकर्षाने जाणविले. त्याच्या लक्षांत आले की पृथ्वी हा एकमेवा असा ग्रह आहे की ज्यावर जीवन फळू, फुलू शकते. प्रवासासंबंधी लिहितांना डा. बोन्डर लिहितात, " अंतराळ प्रवासाच्या अनुभवामुळे माझी जीवनाकडे बघण्याचा द्दष्टीकोन बदलून गेला. मी स्वत:ला खूप भाग्यवान समजते." ३० जानेवारीला अंतराळ यान पृथ्वीवर परत आले.

"डा. रोबर्टा बोन्डर" पहिली कॅनेडियन महिला अंतराळ यात्री, जिने ८ दिवस, १तास, १४मिनिटे, आणि ४४ सेकंद अवकाशात प्रवास केला. "वजन रहित" अवस्थेमुळे तिची उंची ५ सें मि ने वाढली होती. पृथ्वीवर परत आल्यावर ती पूर्ववत आली. प्रवासाबद्दल बोलतांना त्या सांगतात ," या अंतराळ यात्रा कार्यक्रमात सर्वात विस्मयकारक गोष्ट तर पृथीवर पाय ठेवल्यावर लक्षात आली. ८ दिवस सतत वजन रहित अवस्थेत असल्यामुळे पृथ्वीवर परत आल्यावर उठता बसता आमचा तोल जात होता"

डा. रोबर्टा बोन्डर यांनी नासामधे १० वर्षांहून जास्त काळ काम केले. नंतर त्यांनी लिखाणाला सुरवात केली. पुष्कळ पुस्तके त्यांच्या नावावर आहेत. कॅनडामधील २० युनिव्हर्सिटीनी त्यांना मानक डाक्टरेट बहाल करून सन्मानित केले. अनेक शाळांना त्यांचे नाव दिले गेले. त्यांना "आफिसर आफ द आर्डर आफ कॅनडा" हा किताब मिळालाच पण "कॅनेडियन मेडिकल हाल आफ फेम" मधेही सामिल करून घेण्यात आले.

२००५ मधे डा. रोबर्टा ट्रेंट युनिव्हर्सिटी, पिटरबरो, ओंटारियोच्या चान्सलर झाल्या. "छायाचित्रण" हा त्यांचा आवडीचा छंद आहे. "मी काही नवीन शिकत नसेन तर मला बेचैनी येते." हे शब्द अशा महिलेचे आहेत जी प्रत्येक गोष्ट तितक्याच उत्साहाने करते जितक्या उत्साहाने तिने अंतराळात झेप घेतली होती.



*फ्लोरिडामधे "डिस्कव्हरी" अंतराळ यानातील सहप्रवाशांचे छायाचित्र ( १९९२ )*

